**A.A. to Special Repairs Works of Jalka Jagtap M.I.Tank , TL.Chandur Railway, Dist. Amravati**

**जळका जगताप ता.चांदूर रेल्वे, जि.अमरावती ल. पा. प्रकल्पाचे विशेष दुरुस्तीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र. प्रमा २०११/(७९८/२०११)सिंव्य(कामे)
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १७/१२/२०११**

**पहावे :** १) मुख्य अभियंता, जसंवि, अमरावती यांचे पत्र क्र. वि.दुरु ३८७२/ सिं.व्य/ जळका जगताप, दि.३०/०८/२०११
२) मुख्य अभियंता, जसंवि, अमरावती यांचे पत्र क्र. सिं.व्य/ जळका जगताप /४७८०/२०११, दि.२१ ऑक्टोबर, २०११

**प्रस्तावना :-**

जळका जगताप ल.पा. ता.चांदूर रेल्वे, जि.अमरावती प्रकल्पातून पाणी पाझर होत असल्याने धरणात पाणीसाठा होत नाही. त्यामुळे लाभधारक सिंचनापासून वंचीत रहात असल्याने स्थानिक लोकप्रतिनिधींच्या आग्रही मागणीनुसार विशेष दुरुस्तीचा प्रस्ताव मु.अ. (जसं) अमरावती यांचेकडून प्रशासकीय मान्यतेसाठी प्राप्त झाला आहे.

जळका जगताप ल.पा. प्रकल्प सन १९८३ मध्ये पूर्ण झालेला आहे. या प्रकल्पाची एकूण साठवण क्षमता ०.९५ दलघमी इतका असून २ किमी लांबीच्या डाव्या कालव्यामुळे १७२ हेक्टर इतके प्रकल्पीत सिंचन क्षेत्र आहे. सन १९८४ ते ८६ पर्यंत पुरेसा पाऊस असतानाही धरणात पाणीसाठा झाला नाही. सन १९८६-८८ मध्ये काही प्रमाणात धरणात साठा झाला होता. व लगेच दोनतीन महिन्यांच्या कालावधीत खाली झाला. रोधीचर खंदकाच्या खाली असलेल्या दगडातून पाणी झीरपून जात असल्याने वरिष्ठ भूवैज्ञानिक नागपूर यानी सूचित केल्यानुसार सन १९९१-९२

मध्ये धरणाच्या वरच्या बाजूस गॉर्जच्या भागामध्ये सिमेंट ग्राऊटींग करण्यात आले. तथापि, धरणातून होणारी गळती थांबली नाही.

धरणातून होणारी गळती थांबविण्याकरिता क्षेत्रीय स्तरावरुन अधीक्षक अभियंता, माती धरण, मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना, नाशिक यांनी गळतीबाबत समांतर जलरोधी खंदकाची तरतूद करणे, जलरोधी खंदकामध्ये ग्राऊटींग करणे, प्रवाहाचे बाजुकडील उतार (u/s slope) ५० सेंमी स्ट्रीपींग करुन १.५० मी. खोल स्ट्रीप करुन गाभा भरावा करुन त्यावर १.५ मी. जाडीचे कवच भरावा करणे, u/s slope ला ३० सें.मी. जाडीचे अश्मपटल करणे अश्मपटलाखाली १५ सें.मी. जाडीचे रेती टाकणे इत्यादी उपाय सूचविले आहेत.

याव्यतिरिक्त कालव्याचे संकल्पाप्रमाणे काटछेद तयार करणे, क्षतीग्रस्त झालेल्या बांधकामांची दुरुस्ती व पुनर्स्थापना करणे, विमोचक बांधणे, सीटीएफ चे बांधकाम करणे इ. दुरुस्तीची कामे करणे आवश्यक असल्याने सदर दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

## <u>शासन निर्णय</u> :

या शासन निर्णयाद्वारे जळका जगताप ल.पा. ता.चांदूर रेल्वे, जि.अमरावती प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीच्या कामास व इतर अनुषंगीक कामाच्या विशेष दुरुस्तीच्या रु.१२०.२२ लक्ष (रु.११६.४६ लक्ष कामाप्रित्यर्थ व रु.३.७६ लक्ष अनुषंगिक खर्च) प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१. सदर प्रकल्पास महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्याकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ लागू करावा व त्यातील कलम ६ नुसार प्रकल्प अधिसूचीत करण्यात यावा. अशी अधिसूचना काढल्यानंतरच प्रस्तावित दुरुस्तीची कामे हाती घेण्यात यावीत.
२. शासन निर्णय क्र.मजसुप्र १००६/(६८८/०६)लाक्षेवि (कामे) दिनांक १४.६.२००७ अन्वये लघु वितरीकास्तरीय पाणीवापर संस्थांच्या कार्यक्षेत्रातील हस्तांतरपूर्व विशेष दुरुस्तीची कामे कंत्राट व्यवस्थापन समिती स्थापन झाल्यानंतरच हाती घेण्यात यावीत.

३. अधीक्षक अभियंता (माती धरण), मध्यवर्ती संकल्प चित्र संघटना, नाशिक यानी त्यांच्याकडील पत्र क्र.मससं/मा.ध. ४/जळका/३७८/१५७९, दिनांक १७.१२.२००८ (तांत्रिक टिप्पणी क्र.१०४/२००८) नुसार सूचविण्यात आल्याप्रमाणे कामे करण्यात यावीत व काम करताना आवश्यक ती आधार सामुग्री परत अ.अ. म.स.सं. नाशिक याना कळविण्यात यावी.

४. गळती प्रतिबंधक उपाययोजनेचे पूर्ण काम झाल्यानंतर धरणामध्ये प्रकल्पीय साठा होत असल्याची खातरजमा मु.अ. (जसं) अमरावती यानी करुन कालवा दुरुस्तीची पुढील कामे करण्यास परवानगी द्यावी.

५. शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/२००९)/मु.प्र.२ दिनांक १५.१.२०१० मधील सर्व अटींच्या अधीन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी.

६. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

या कामावर होणारा खर्च ४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ,विशेष दुरुस्ती/विस्तार व सुधारणा या लेखाशीर्षाखाली विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास मंजूर अनुदानातून भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. २८५, सन २०११-१२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दिनांक १५/५/२००९ मधील भाग-१ उप विभाग-३ मधील अ.क्र.४ मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु.५ कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबंधित विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१११२१७१०४९०४१२४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत : परिशिष्ट

**( पां. तु. केदारे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.
मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती,
अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्र. प्रमा २०११/(७९८/२०११)/सिंव्य(कामे),**
दिनांकः १७/१२ /२०११ चे प्रपत्र

## परिशीष्ट

| अ. क्र. | शीर्ष व उपशीर्ष | तरतूद (लक्ष रुपये) |
|---|---|---|
| १ | **(१) मुख्य शीर्ष कामे**<br>अ) सी-कामे | ९७.१८ |
| | **(२) मुख्य कालवा**<br>अ) डी- विमोचक<br>ब) एफ-आरएचटी वर्क्स<br>क) एल- मातीकाम | <br>६.२१<br>१.०८<br>११.९९ |
| | **एकूण** | ११६.४६ |
| | अनुषंगिक खर्च | ३.७६ |
| | **एकूण** | १२०.२२ |